**"महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळाकरीता"** (Maharashtra State Infrastructure Development Corporation) **मनुष्यबळ नियुक्ती व संचालक मंडळाची रचना विहित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२३/प्र.क्र.११२ /नियो-१अ**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २३ ऑगस्ट,२०२३.

**संदर्भ :** सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२०/प्र.क्र.१०७/नियो-१अ, दि.२२.०५.२०२३.

**प्रस्तावना:-**

संदर्भीय शासन निर्णयान्वये रस्ते, बंदरे, विमानतळ, रेल्वे, मेट्रो, वीज इत्यादी २२ पायाभूत सुविधा विकास क्षेत्रांसाठी निधी उभारणे आणि प्रकल्प राबविण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियंत्रणाखाली "महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ" (Maharashtra State Infrastructure Development Corporation-MSIDC) या नावाने महामंडळाची स्थापना करण्यात आली आहे. संदर्भीय शासन निर्णयामध्ये महामंडळाकरीता मनुष्यबळ नियुक्ती व संचालक मंडळाची रचना विहित करण्यात आली आहे. मनुष्यबळ व संचालक नियुक्ती यामधील काही तरतदींमध्ये अंशत: सुधारणा करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** "महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळावर" (MSIDC) मनुष्यबळ व संचालक मंडळ याविषयीच्या तरतूदींमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा कऱण्यात येत आहेत :-

१. संदर्भीय शासन निर्णयातील परिच्छेद क्र.७ मध्ये नमूद केलेल्या, “मुख्य वित्तीय अधिकारी” या पदावर सहसंचालक दर्जाच्या अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यात येईल.

२. संदर्भीय शासन निर्णयातील परिच्छेद क्र.७ मध्ये नमूद केलेल्या “प्रादेशिक वेतन व लेखाधिकारी” या पदावर सहायक संचालक दर्जाच्या अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यात येईल.

३. "महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ" संचालक मंडळाची सुधारित रचना खालीलप्रमाणे विहित कऱण्यात येत आहे-

| अ.क्र. | पदनाम | पदाधिकारी |
|---|---|---|
| १ | महामंडळाचे अध्यक्ष(पदसिध्द) | मा.मंत्री (सा.बां.) |
| २ | महामंडळाचे व्यवस्थापकीय संचालक(MD) | केंद्र शासनाच्या सेवेतील किमान स्तर(level)-१४ वेतनश्रेणीतील किंवा राज्य अभियांत्रिकी सेवेतील किमान स्तर(level) S-३० वेतनश्रेणीतील कार्यरत/ सेवानिवृत्त अधिकारी |
| ३ | संचालक (पदसिध्द) | सचिव (रस्ते)सा.बां.विभाग |
| ४ | संचालक (पदसिध्द) | सचिव (बांधकामे) सा.बा.विभाग |
| ५ | संचालक | शासनाने नियुक्त केलेले ४ तज्ञ व इतर दोन संचालक |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०८२३१७०७४७९९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a,
pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF,
serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76,
cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2023.08.23 17:13:16 +05'30'

**( ग.सं.कचरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अप्पर मुख्य सचिव
३) मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय,मुंबई
६) अ.मु.स.(वित्त) यांचे स्वीय सहाययक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अ.मु.स.(सा.बां.) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) अ.मु.स.(नियोजन) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सर्व मंत्रालयीन विभाग

१०) सचिव (रस्ते / बांधकामे), यांचे स्वीय सहायक, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई

११) सर्व मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग

१२) उप सचिव (रस्ते), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३) अवर सचिव(नियोजन), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई

१४)अवर सचिव (इमारती), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५) सर्व अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ

१६) कार्यासन क्र.व्यय -११/अर्थबळ, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१७) निवड नस्ती (नियोजन-१अ), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई